शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत (अनिवार्य)

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०२३/प्र.क्र.१७/म-७
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १२ जुलै, २०२३

**वाचा :-** १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७/, दि.१९.१२.२००५

२) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-१२०५/प्र.क्र.१८९/म-७/, दि.२३.०१.२००६

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१२/०४/२०२३.

४) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-२०२२/प्र.क्र.२६/म-७/, दि.२८.०६.२०२२.

५) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र.एससीवाय-२०२३/प्र.क्र.१७/म-७/, दि.२६.०६.२०२३.

**प्रस्तावना :-**

नापिकी, कर्जबाजारीपणा व कर्ज परतफेडीचा तगादा या तीन कारणांमुळे झालेल्या शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी सहाय्यक अनुदानापोटी संदर्भाधीन क्रमांक २ वरील शासन निर्णयातील कार्यपध्दतीनुसार, जिल्हास्तरीय समितीने पात्र ठरविलेल्या शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना रू.१.०० लक्ष मदत देण्यात येते. या प्रयोजनासाठी मुख्य लेखाशिर्ष २२३५ ३१९५ अंतर्गत सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात करण्यात आलेली तरतुद मुंबई व मुंबई उपनगर वगळता सर्व जिल्हाधिकारी यांना वाटप करण्यासाठी सर्व सर्व विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नापिकी, कर्जबाजारीपणा व कर्ज परतफेडीचा तगादा या तीन कारणांमुळे झालेल्या शेतकरी आत्महत्या प्रकरणी आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना तातडीने मदत देण्यासाठी सहाय्यक अनुदानापोटी सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात करण्यात आलेल्या तरतूदीपैकी वर नमूद दिनांक २६.०६.२०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेली १०% तरतूद वगळता उर्वरित अवितरीत ९०% रू.१५३३०.०० लक्ष पुणे विभाग वगळता उर्वरित जिल्हाधिकारी यांच्या खाती जमा करण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये नमूद केल्यानुसार उर्वरित सर्व विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. शेतकरी आत्महत्यांच्या प्रकरणांत विहित कार्यवाही तातडीने पुणे करून आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या वारसांना मदत देण्यात यावी.

३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२, समाजकल्याण १०४, वृध्द, अपंग व निराश्रीतांचे कल्याण (००) (०३), आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांच्या वारसांना वित्तीय सहाय्य (अनिवार्य) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ ३१९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदर लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखपाल

कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर आदेश हे वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक ३ वरील शासन परिपत्रकातील तरतुदींस तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२९/२०२३/व्यय-९, दिनांक ०५.०७.२०२३ अन्वयये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१२१५३८४८१०१९ असा आहे. हा आदेश डिजीटलस्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY AUDUMBAR DHARURKAR

Digitally signed by SANJAY AUDUMBAR DHARURKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RELIEF AND REHABILITATION DEPARTMENT, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FCF7172A73579B34FA622983D8FB647780FBEF1D35A1CA975955EB9193F3F800, cn=SANJAY AUDUMBAR DHARURKAR
Date: 2023.07.14 12:44:49 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त.
२) सर्व जिल्हाधिकारी,
३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६) संचालक, लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) उप सचिव (अर्थ-६/व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उप सचिव (ब-१/२), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (म-३/म-११), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (म-७)

शासन निर्णय, क्रमांक : एससीवाय-२०२३/प्र.क्र.१७/म-७, दिनांक १२ जुलै, २०२३
विवरणपत्र- "अ"

रूपये लाखात

| अ.क्र. | विभागीय आयुक्त तथा नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदानाची रक्कम |
|---|---|---|
| १ | कोकण | ०४.०० |
| २ | नाशिक | २०१.०० |
| ३ | औरंगाबाद | ६६५.०० |
| ४ | अमरावती | ५३०.०० |
| ५ | नागपूर | १३०.०० |
| | **एकूण :-** | **१५३०.००** |